नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समिती (जिल्हा गोंदिया)
सभापती निवासस्थान, अधिकारी-कर्मचारी निवासस्थान
बांधकाम व उर्वरीत कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.६४/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :३१मार्च,२०१०

संदर्भ :- १.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडपीई-१०९७/सीआर-४३६०/२६, दि.१२.६.१९९८
२.शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.पंसई २००९/प्र.क्र.५४/ पंरा-७,दि.२३.६.२००९
३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,गोंदिया,यांचे पत्र क्र.जिपगो/साबांवि/डे-२एफ/वशि/९१२/१०,दि.२०.३.१०

प्रस्तावना :-

नव निर्मित सडकअर्जुनी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत, अधिकारी व कर्मचारी निवासस्थाने व गोदाम बांधकाम अशा एकत्रित कामाच्या एकूण रु.१७८.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामांना संदर्भीय दिनांक- १२ जून, १९९८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामधील प्रशासकीय इमारत बांधकाम, टाईप-२ निवासस्थाने व इतर उपकामे कामे सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेवून पूर्ण करण्यात आली आहेत. सदर प्रशासकीय मान्यतेस दहा वर्षाचा कालावधी झालेला असून, त्यामधील सभापती निवासस्थान टाईप IV, टाईप III निवासस्थान ८ व गोदाम बांधकाम इ. शिल्लक कामे ही दर वर्षी सा.बां.विभागाच्या दरपत्रकात वाढ होत असल्याने हाती घेणे शक्य नसल्याने, सदरील कामे हाती घेण्यासाठी शासनाने संदर्भीय दिनांक २२.६.२००९ च्या आदेशानुसार मूळ प्रशासकीय मान्यतेचे आदेश रद्द करुन, हाती घ्यावयाच्या रु.१९०.१७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदरील कामे माहे मार्च,२०१० अखेरपर्यंत पूर्ण होत असून, त्यासाठी शासनाने उपलब्ध करुन दिलेला रु.१९०.१७ लक्ष निधी पूर्णपणे खर्च होणार आहे.

२. आता, नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समितीची प्रशासकीय व निवासी इमारत त्वरेने कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., गोंदिया यांनी खालील उपकामे आवश्यक असल्याने ती हाती घेण्याचे प्रस्तावित केले आहे. :-

१. नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समितीची प्रशासकीय इमारत ते इ.जि.मा.शेंडा-सडकअर्जुनीपर्यंतचे ५०० मी.अंतर असून त्या ठिकाणी पोचमार्ग व गटार बनविणे आवश्यक असून, त्याकरीता रु.१२.९८ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे.

२. शासकीय मालमत्तेचे अतिक्रमणा पासून संरक्षण होण्याच्या दृष्टीने प्रशासकीय इमारतीभोवती संरक्षण भिंत बांधणे गरजेचे असल्याने, त्यासाठी रु.१५.००लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे.

३. पंचायत समितीच्या निवासी इमारतींचे बांधकाम डोंगरालगत असल्याने भू:सल्लखनापासून इमारतीचा बचाव करण्यासाठी संरक्षक भिंत बांधणे गरजेचे असल्याने, त्यासाठी रु.१५.०० लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आहे. सोबत बांधकामाचे फोटो जोडण्यात आले आहेत.

४. तसेच प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी जनेतेच्या सोयी साठी सायकल स्टॅन्ड व वाहनतळ बांधणे आवश्यक असल्याने त्यासाठी रु.१४.७० लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे.

३. वरील सर्व उपकामांना या पूर्वी प्रमा अथवा निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला नसल्याने व सदरील उपकामे हाती घेणे आवश्यक असल्याने त्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

(१). नवनिर्मित सडकअर्जुनी पंचायत समितीची प्रशासकीय इमारत ते इ.जि.मा.शेंडा-सडकअर्जुनीपर्यंत पोचमार्ग व गटार बांधकाम करण्यासाठी रुपये.१२.९८ लक्ष, (२). शासकीय मालमत्तेचे अतिक्रमणा पासून संरक्षण होण्याच्या दृष्टीने प्रशासकीय इमारतीभोवती संरक्षण भिंत बांधण्यासाठी रुपये.१५.००लक्ष, (३). पंचायत समितीच्या निवासी इमारतींचे बांधकाम डोंगरालगत असल्याने भू:सल्लखनापासून इमारतीचा बचाव करण्याकरीता संरक्षक भिंत बांधण्यासाठी रुपये.१५.०० लक्ष आणि (४). प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी जनेतेच्या सोयी साठी सायकल स्टॅन्ड व वाहनतळ

बांधण्यासाठी रुपये.१४.७० लक्ष अशा एकूण रक्कम रुपये-५७,६८,०००/-(रुपये सत्तावन्न लक्ष अडुसष्ट हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.-

४. उपरोक्त बांधकामासाठी अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B D S) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज, ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००३३१२१०७५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गोंदिया
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गोंदिया
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया
१०) सभापती, पंचायत समिती, गोंदीया, जिल्हा गोंदिया
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सडकअर्जुनी, जिल्हा गोंदिया
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१५)का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई